# अँड्रोक्लस आणि सिंह

इसापच्या गोष्टीवर आधारित

लेखक: **रसेल पंटर**

चित्र: **माईक आणि कार्ल गॉर्डन**



अनुवाद: **सुजाता गोडबोले**

# अँड्रोक्लस आणि सिंह

इसापच्या गोष्टीवर आधारित



लेखक: **रसेल पंटर**

चित्र: **माईक आणि कार्ल गॉर्डन**

अनुवाद: **सुजाता गोडबोले**

फार वर्षांपूर्वी अँड्रोक्लस नावाचा
एक माणूस होता.

तो खूप गरीब
होता...



पण अतिशय दयाळू.



तो ब्रुटस नावाच्या एका श्रीमंत
माणसाकडे काम करत असे.




ब्रुटस रोम नावाच्या शहराबाहेरच्या
एका मोठ्या महालात राहत असे.

ब्रुटस त्याच्या गुलामांना
खूप काम करायला लावत असे.
अँड्रोक्लसला रोज
महालाच्या पायऱ्या घासाव्या लागत...



फरशी पुसावी
लागे...




अंथरूणे  काढावी लागत...



स्वयंपाक करावा लागे...






जेवण वाढावे लागे...

भांडीही घासावी लागत…



पण ब्रुटस त्याला कामाचे काहीच पैसे
देत नसे.
अँड्रोक्लसला रोज फक्त
एक वाळलेला शिळा पाव मिळत असे.




एक दिवस अँड्रोक्लसने
तिथून पळून जायचे ठरवले.
रात्र झाल्यावर तो एका खिडकीतून बाहेर पडला.



आणि जंगलात पळून गेला.

अँड्रोक्लसने यापूर्वी जंगल कधीच पाहिले नव्हते.
सगळीकडे अंधार होता
आणि ते भीतीदायकच होते.

अरे बापरे!



अचानक त्याला एका झाडामागून
मोठा आवाज ऐकू आला.

गुर्र्र्र्र ...!

अँड्रोक्लस चांगलाच दचकला.
“क... कोण आहे तिकडे?” त्याने विचारले.

त्याने झुडपाभोवती पाहिले आणि

गुर्र्र्र्र... !



तो एक मोठा सिंह होता.
अँड्रोक्लस घाबरून पळत सुटला.

पण सिंह काही अँड्रोक्लसच्या मागे धावला नाही.
तो दगडासारखा एका जागीच बसून राहिला.



अँड्रोक्लसला आश्चर्य वाटले.
तो परत सिंहाकडे गेला.
“तू मला पकडायला का नाही आलास?”
त्याने विचारले.

सिंह उसासा टाकून म्हणाला,
“मला पळता येत नाही,
आणि चालता देखील येत नाही.
माझ्या पायात एक काटा गेला आहे.”




“बिचारा! थांब मी तुला मदत करतो.”
अँड्रोक्लस म्हणाला.

त्याने तो काटा पकडला.
“तुला जरा दुखेल हं.”




अँड्रोक्लसने जमेल तितक्या लवकर
काटा ओढून बाहेर काढला.

“आ… आ…” सिंह विव्हळत म्हणाला.
“झालं सुद्धा,” अँड्रोक्लस म्हणाला.




“धन्यवाद! माझं नाव लिओ,”
सिंह आनंदाने म्हणाला.

सिंह हसला आणि त्याने
अँड्रोक्लसला प्रेमाने चाटून एक मोठी पपी दिली.




त्या दिवसापासून अँड्रोक्लस आणि लिओ
यांची घट्ट मैत्री झाली.

ते दोघे जंगलातल्या
एका गुहेत राहू लागले.



अन्न शोधण्यासाठी दोघेही
बाहेर जात असत.



आणि रोज रात्री
एकत्रच जेवत
असत.

एक दिवस सकाळी अँड्रोक्लसला
जंगलात एक नवीन माणूस दिसला.



त्याने आवाज न करता हळूच जवळ जाऊन पहिले.

"हा तर सैनिक आहे!" त्याने विचार केला.
"आता याला काय बरे हवे असेल?"



त्या सैनिकाने कागदाची एक सुरळी उघडली.
अँड्रोक्लस घाबरून पाहतच राहिला.

WANTED
for running away
Androcles

आता कसा सापडत
नाही तेच बघतो

तेवढ्यात अँड्रोक्लसच्या नाकावर एक माशी बसली.
त्याला गुदगुल्या झाल्या.

आ... छि!



“ए!” सैनिक ओरडला.

“आहेस तिथेच उभा रहा!”

सैनिकाने आपली तलवार बाहेर काढली.

वाचवा!

आणि अँड्रोक्लस पळू लागला.

झुडपांमधून सैनिक
अँड्रोक्लसच्या मागे
पळू लागला...

टेकडीवर...

आणि टेकडीवरून खाली...



झऱ्यापलीकडे...

झाडांभोवती...

आणि ते जंगलाबाहेर आले.
अँड्रोक्लस खूप दमला
आणि एका जागी उभा राहिला.



सैनिकाने अँड्रोक्लसला पकडून
एका गाडीत टाकले.

सैनिक ओरडून म्हणाला,
“नाही! मी तुला रोमला नेणार आहे.”






अँड्रोक्लसने घाबरून विचारले,
“तू मला ब्रुटसकडे परत नेतो आहेस का?”

“पण का?” अँड्रोक्लसने विचारले.
“ते तिथे गेल्यावर कळेल,” सैनिकाने उत्तर दिले.

अँड्रोक्लस धक्के खात खात रोमला पोचला.
शहरात खूप गर्दी होती
आणि तऱ्हेतऱ्हेचे आवाज देखील होते.

त्याने एका वेळी इतके लोक
एकत्र कधीच पाहिले नव्हते.



थोड्या वेळाने त्याला एक प्रचंड मोठी गोल इमारत दिसली. त्याने विचारले, “हे काय आहे?”



“हे सामन्याचे मैदान आहे. तू तिथेच निघाला आहेस.” सैनिकाने उत्तर दिले.

“तिथे काय करतात?” अँड्रोक्लसने विचारले. “तू बघशीलच!” सैनिकाने उत्तर दिले.

क्लिंकस नावाच्या एका माणसाने
अँड्रोक्लसला गाडीतून फरपटत बाहेर काढले.




मग तो अँड्रोक्लसला सिंहांच्या पिंजऱ्यासमोरून
सामन्यांच्या मैदानात घेऊन गेला.



ते सिंह काही लिओ सारखे गरीब नव्हते.

गुर्ररररर... ! गुर्ररररर... !




अँड्रोक्लसने घाबरून विचारले,
“यांना इथे का आणले आहे?”
“ते आता कळेलच!” क्लिंकस म्हणाला.

मार्कोस नावाच्या एका माणसाबरोबर
अँड्रोक्लसला तुरुंगात ठेवण्यात आले.



अँड्रोक्लसने विचारले,
“आता काय होईल?”
मार्कोस म्हणाला,
“आपल्याला सामन्यांच्या मैदानात लढावे लागेल.”

“पण मला तुझ्याशी लढायचे नाही आहे.”
अँड्रोक्लस म्हणाला.
एक उसासा सोडून मार्कोस म्हणाला,
“आपल्याला एकमेकांशी लढायचे नाही...”



“आपल्याला सिंहांशी लढायचे आहे.”

अँड्रोक्लसने एक आवंढा गिळला.




मार्कोस म्हणाला,
“रोममधले सर्वजण ते पाहायला येतात.
महाराज देखील येतात.”

“आपली लढत उद्या दुपारी आहे.”
मार्कोसने आणखी माहिती दिली.



अँड्रोक्लस आणि मार्कोस दोघांनाही
त्या रात्री फारशी झोप आली नाही.

दुसऱ्या दिवशी दुपारी
क्लिंकस अँड्रोक्लसला तुरुंगातून
फरपटत बाहेर घेऊन गेला.

क्लिंकसने अँड्रोक्लसला
दरवाजा बाहेर ढकलून दिले.







एका लांबलचक अंधाऱ्या
भुयारातून तो त्याला
एका दरवाजाकडे घेऊन गेला.

अँड्रोक्लस मैदानाच्या
मधोमध
उभा राहिला.


हजारो लोक त्याच्या सभोवताली बसले होते.
ते त्याला प्रोत्साहन देत ओरडू लागले.
आता सिंह आणा!
बाजूच्या एका भिंतीतील एक दार उघडले.
आणि एक भला मोठा सिंह
दारातून उडी मारून आत आला.
गुड लक, अँड्रोक्लस!
तुला त्याची गरज पडेलच!

अँड्रोक्लस  भीतीने थरथर कापत होता.

आता पळून जायला कुठेच जागा नव्हती.

अँड्रोक्लसने डोळे मिटले.

त्याने विचार केला,

“हे सगळं लवकर संपलं तर बरं होईल.”



आणि मग एक चमत्कार झाला...

अँड्रोक्लसचा हात कोणीतरी चाटते
आहे असे त्याला वाटले.
त्याने हळूच डोळे उघडले...
तो लिओ होता!




लिओ म्हणाला, “मला त्यांनी काल रात्री पकडले,
आणि लढायला इथे घेऊन आले.”

अँड्रोक्लसने आपल्या मित्राला मिठी मारली.
जमलेल्या लोकांचा यावर विश्वास बसेना!



“अँड्रोक्लसने सिंहाशी मैत्री केली आहे!
हा मोठाच शूर वीर आहे!”
ते ओरडू लागले.




मग क्लिंकस अँड्रोक्लसला
महाराजांकडे घेऊन गेला.

महाराज म्हणाले,
“तू फार शूर आहेस,
मी तुला मुक्त करतो.”



अँड्रोक्लसला त्याच्या मित्रांची आठवण झाली.
“तुम्ही कृपा करून मार्कोस आणि सिंहाला
देखील मुक्त कराल का?”

महाराज हसले.

ते म्हणाले, “ठीक आहे.”

माझा हिरो!

अँड्रोक्लस आणि त्याचे मित्र

रोम मधून बाहेर पडले

आणि त्यांनी आपला स्वतःचा खेळ सुरु केला.

मग कोणालाच कोणाशी लढावे लागले नाही.



**'अँड्रोक्लस आणि सिंह'** इसापच्या लोककथेवर आधारित आहे. ग्रीसमध्ये सुमारे ४००० वर्षांपूर्वी सांगितल्या जाणाऱ्या लोककथांचा हा संग्रह आहे. कथेच्या अखेरीस नेहमी एक शिकवण असते. या कथेचे तात्पर्य आहे, "तुमच्या मित्रांशी चांगले वागा म्हणजे ते तुम्हाला कधीच विसरणार नाहीत."

